राज्यातील पाच मोठे जलाशयामधून गाळ व रेती / वाळू मिश्रीत गाळ निष्कासनाच्या कामाकरिता मानक निविदा कागदपत्रे तयार करण्यासाठी स्थापित केलेल्या समितीचे अध्यक्ष बदलणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन शुद्धीपत्रक क्रमांक : लाक्षेवि-२०२०/प्र.क्र.७०/२०२२/भाग-३/लाक्षेवि(आ)**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई : ४०००३२.

दिनांक : १५/०३/२०२३

**वाचा :-**

१. जलसंपदा विभागाचे शासन निर्णय क्र. मेरिना -२०१८/प्र.क्र.१३७/२०१८ /लाक्षेवि (आस्था), दि.०३/०८/२०१८

२. जलसंपदा विभागाचे शासन निर्णय क्रमांक लाक्षेवि-२०२०/(प्र.क्र.७०/२०२२/भाग-१)/लाक्षेवि (आस्था), दि.१८/०७/२०२२

३. जलसंपदा विभागाचे शासन निर्णय क्रमांक लाक्षेवि-२०२०/(प्र.क्र.७०/२०२२/भाग-१)/लाक्षेवि (आस्था), दि.२१/०९/२०२२

**प्रस्तावना : -**

राज्यातील जुन्या धरणात साठलेला गाळ काढून तो शेतामध्ये वापरुन शेत जमिनीची उत्पादन क्षमता वाढविणे व त्याचबरोबर राज्यातील सर्व धरणाचे जलाशय गाळमुक्त करण्याचे धोरण शासनाने स्विकारले असून मोठ्या पाटबंधारे प्रकल्पातील गाळ व गाळमिश्रीत रेती/वाळू निष्कासनाचे धोरण संदर्भांकित शासन निर्णय क्र. १ अन्वये निर्गमित केले आहे. तथापि सदर शासन निर्णयानुसार सन २०१९ मध्ये सुरू केलेली गाळ व गाळमिश्रीत वाळू/रेतीच्या निष्कासनाची ई-निविदेद्वारे प्रक्रिया रद्द करण्यात आली आहे. त्याचे मुख्य कारण म्हणजे निविदा कागदपत्रामध्ये काही बाबतीत संदिग्धता व अंतरविरोध असल्याने तक्रारी प्राप्त होत होत्या.

त्यानुषंगाने निविदा कागदपत्रामध्ये अटी व शर्ती सुधारीत करून सुधारित मानक प्रारूप ई-निविदा कागदपत्रे तयार करण्यासाठी संदर्भांकित शासन निर्णय क्र.२ अन्वये, महासंचालक (सं.प्र.ज.सं.सु.), नाशिक यांच्या अध्यक्षतेखाली नव्याने समितीचे गठन करण्यात आले आहे व समितीचे अध्यक्ष म्हणून श्री. रा. र. शहा, महासंचालक (सं.प्र.ज.सं.सु.), नाशिक यांना नेमले होते. तथापि प्रशासकीय कारणास्तव संदर्भ क्र.०३ मध्ये नमूद शासन निर्णयान्वये सदर समितीचे अध्यक्ष बदलून श्री.राजेंद्र एम. मोहिते, कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांची नियुक्ती करण्यात आली होती.

आता श्री.राजेंद्र मोहिते, कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचेकडे सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार आहे. त्यामुळे त्यांचेकडील कार्यबाहुल्यामुळे तसेच इतर प्रशासकीय बाबींचा विचार करता गाळ निष्कासन मानक निविदा समितीचे अध्यक्ष

बदलून अन्य व्यक्तींची नियुक्ती करणे आवश्यक आहे. त्यानुसार डॉ.संजय बेलसरे, महासंचालक (संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता), महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक यांची समितीचे अध्यक्ष म्हणून नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुद्धीपत्रकः-**

वरील सर्व बाबींचा साकल्याने विचार करुन संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयामध्ये नमुद गाळ निष्कासन मानक निविदा समितीचे अध्यक्ष म्हणून श्री.राजेंद्र एम. मोहिते, कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचेऐवजी डॉ.संजय बेलसरे, महासंचालक (संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता), महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक यांची नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच या समितीला दि.३१ मे, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०३१६११५४४९७७२७ असा आहे. हे शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SANJIV ARUNKANT TATU

Digitally signed by SANJIV ARUNKANT TATU
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2d4c9d30f88b6a2745465552d33743e7c967f8c7a5d287520a1c61013a9d322a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CDC760A62A3C19856AA294BBEA7AE1D009186809C9360393D324611015F646EA, cn=SANJIV ARUNKANT TATU
Date: 2023.03.16 15:47:54 +05'30'

**(सं. अ. टाटू)**
**मु.अ. (पा.) व सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव राजभवन, महाराष्ट्र राज्य.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.
३. सर्व मंत्री, महाराष्ट्र राज्य.
४. सर्व राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.
५. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
६. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये.
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव.
९. सर्व मंत्रालयीन विभाग.
१०. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
११. सचिव(लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. सचिव(प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
१४. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे.
१५. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१६. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१७. निवडनस्ती.